राष्ट्रपिता महात्मा गांधी यांच्या १५० व्या जयंतीनिमित्त गांधी एक विचार या पुस्तकाच्या विचारांच्या प्रचार व प्रसाराबाबत.

# महाराष्ट्र शासन

## उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग

## शासन परिपत्रक क्रमांक:- केव्हीबी-२०१८/प्र.क्र.१५७/उद्योग-६

मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
दिनांक :- ११ ऑक्टोबर, २०१८.

वाचा:- ग्राम विकास विभाग, शासन निर्णय क्रमांक:- संकीर्ण-२०१८/प्र.क्र.८५/पंरा-१, दिनांक १६ एप्रिल, २०१८.

प्रस्तावना:-

केंद्र तसेच राज्य शासनामार्फत सन २०१८-१९ ते २०२०-२१ या कालावधीत मोहनदास करमचंद गांधी ऊर्फ राष्ट्रपिता महात्मा गांधी यांची १५० वी जयंती महोत्सव साजरा करण्यात येत आहे. सदर महोत्सवाची दिनांक २ ऑक्टोबर, २०१८ पासून सुरूवात झालेली आहे. त्यानुषंगाने पंतप्रधान रोजगार निर्मिती कार्यक्रमांतर्गत मंत्रालयाच्या त्रिमूर्ती प्रांगणात महाखादी व ग्रामोद्योग उत्पादित वस्तुंच्या भव्य प्रदर्शनाचे मा. मुख्यमंत्री महोदयांच्या हस्ते दिनांक ०३ ऑक्टोबर, २०१८ रोजी उदघाटन करण्यात आले. सदर प्रदर्शन ३ ते ६ ऑक्टोबर, २०१८ या कालावधीत आयोजित करण्यात आले आहे. सदर प्रदर्शनात मा. मुख्यमंत्री महोदयांच्या हस्ते महाराष्ट्राच्या खादी व ग्रामोद्योग मंडळामार्फत प्रकाशित करण्यात आलेल्या **"गांधी एक विचार"** या पुस्तकाचे लोकार्पण करण्यात आले. सदर पुस्तक खादी व ग्रामोद्योग मंडळाच्या,१९/२१, मनोहरदास मार्ग, फोर्ट मुंबई-१ येथील मुख्यालयात उपलब्ध आहे.

२. या लोकार्पण कार्यक्रमात मा.मुख्यमंत्री महोदयांनी महात्मा गांधीजींच्या विचारांचा मोठ्या प्रमाणात प्रसार व प्रचार होण्याच्या दृष्टीने शासनाच्या दैनंदिन पत्रव्यवहारामध्ये/कार्यालयीन क्षेत्रामध्ये महात्मा गांधीजींच्या विचारांना प्रसिध्दी मिळावी याअनुषंगाने शासन स्तरावरील सर्व पत्रव्यवहारात **"गांधी विचार"** (Gandhi Thoughts) हे विविध विषयावरील विचार टॅगलाईन स्वरूपात प्रत्येक पृष्ठाच्या शेवटी (फूटरमध्ये) समाविष्ट करण्यात याव्यात. अशा सूचना दिल्या. त्यानुषंगाने शासनाने खालीलप्रमाणे परिपत्रक निर्गमित करण्याचा निर्णय घेतला आहे:-

**शासन परिपत्रक:-**

मोहनदास करमचंद गांधी ऊर्फ राष्ट्रपिता महात्मा गांधी यांचे विचार हीच त्यांची खरी प्रतिष्ठा आहे. त्यामुळे महात्मा गांधीजींचे १५० वे जयंती वर्ष जर खऱ्या अर्थाने साजरे करायचे असेल तर त्यांचे विचार सर्वसामान्य जनतेच्या मनात रुजविणे गरजेचे आहे. त्या अनुषंगाने **"गांधी एक विचार"** या पुस्तकातील महात्मा गांधीजींच्या विचारांचा मोठ्या प्रमाणात प्रसार व प्रचार होण्याच्या दृष्टीने शासन स्तरावरील दैनंदिन पत्रव्यवहारात या पुस्तिकेतील आपल्या

विभागाशी सुलभ किंवा सुयोग्य असे विचार टॅगलाईन स्वरुपात प्रत्येक पृष्ठाच्या शेवटी (फूटरमध्ये) समाविष्ट करण्यात यावेत आणि त्यापुढे "मोहनदास करमचंद गांधी" असे लिहावे.

उपरोक्त प्रमाणे कार्यवाही करण्याबाबत सर्व विभागांनी त्यांच्या अधिनस्त असलेल्या कार्यालयांना त्याप्रमाणे सूचना द्याव्यात.

३. सदर शासन परिपत्रक महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आले असून त्याचा संगणक संकेतांक क्रमांक २०१८१०१११२१६४८०९१० असा आहे. हे परिपत्रक डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Rajiv Madhav Ambikar

Digitally signed by Rajiv Madhav Ambikar
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Industries Energy and Labour Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=4afb47d807935092599a3e28024dd3d3c461bada30a950e81e666a02aad578f5, cn=Rajiv Madhav Ambikar
Date: 2018.10.11 12:19:34 +05'30'

**( राजीव आंबीकर )**

कार्यासन अधिकारी

**प्रति,**

१. मा. राज्यपालांचे प्रधान सचिव, राजभवन, मलबार हिल, मुंबई.
२. मा. मुख्यमंत्री महोदयांचे अपर मुख्य सचिव, मुख्यमंत्री सचिवालय, मुंबई-३२.
३. सर्व मा. मंत्री/राज्यमंत्री यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई-३२.
४. मा. सभापती, महाराष्ट्र विधानपरिषद, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय,विधानभवन, मुंबई
५. मा. अध्यक्ष, महाराष्ट्र विधानसभा, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय,विधानभवन, मुंबई
६. मा. विरोधी पक्षनेता, महाराष्ट्र विधानपरिषद/विधानसभा, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, विधानभवन,मुंबई.
७. मा. मुख्य सचिव, महाराष्ट्र शासन, मंत्रालय, मुंबई-३२.
८. सर्व अपर मुख्य सचिव/प्रधान सचिव/सचिव, मंत्रालयीन विभाग, मंत्रालय,मुंबई-३२.
९. सर्व मंत्रालयीन विभाग, मंत्रालय, मुंबई-३२.
१०. मुख्य कार्यकारी अधिकारी, महाराष्ट्र राज्य खादी व ग्रामोद्योग मंडळ, मुंबई.
११.महासंचालक, माहिती व जनसंपर्क संचालनालय, मुंबई.
१२.निवडनस्ती (उद्योग-६).